**पदनिर्मिती, पदभरती व पदांचे पुनरुज्जीवन यांबाबतचे निर्बंध व आनुषांगिक आढावे. तांत्रिक बाबींसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याच्या तरतुदीत सुधारणा करणेबाबत .....**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय क्र. पदनि २०११/प्र.क्र. १८५/११/वित्तीय सुधारणा-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २६ ऑगस्ट, २०११

**संदर्भः** (१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि. १० सप्टेंबर, २००१.
(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक असंक-१००१/प्र.क्र.२९(भाग २)/२००२/वित्तीय सुधारणा,दि. २६ फेब्रुवारी, २००२.

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतुदीनुसार तांत्रिक कारणासाठी विशिष्ट कालावधीकरीता निर्माण करावयाच्या अधिसंख्य पदांच्या निर्मितीसाठी उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता मिळण्यास काही प्रकरणी बराच कालावधी लागत असल्याचे निदर्शनास आले. ज्यामुळे संबंधित परिविक्षाधीन / प्रशिक्षणार्थी उमेद्‌वारांना त्यांचे वेतन व भत्ते अदा करण्यास अडचणी येत होत्या. सदर वस्तुस्थिती विचारात घेऊन शासन निर्णय दि. १०.०९.२००१ मध्ये शासन निर्णय दि. २६.०२.२००२ अन्वये समाविष्ट नवीन उपपरिच्छेद ४.१० मध्ये सुधारणा करण्याची बाब विचाराधीन होती. तद्‌नुसार शासनाने सदर शासन निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि. १० सप्टेंबर, २००१ मध्ये शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक असंक-१००१/प्र.क्र.२९ (भाग २)/२००२/वित्तीय सुधारणा, दि. २६ फेब्रुवारी, २००२ अन्वये नव्याने समाविष्ट करण्यात आलेल्या उप परिच्छेद क्र. **४.१०** ऐवजी खालील सुधारित उपपरिच्छेद समाविष्ट करण्यात यावा

**सुधारित उपपरिच्छेद :**

४.१० – महाराष्ट्र लोकसेवा आयोग / केंद्रीय लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेद्‌वारांचा विहीत परिविक्षा कालावधी / प्रशिक्षण कालावधी या तांत्रिक कारणासाठी विशिष्ट कालावधीकरीता निर्माण करावयाच्या अधिसंख्य पदांच्या निर्मितीसाठी उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता आवश्यक असणार नाही. तथापि, अशा प्रस्तावांबाबत संबंधित प्रशासकीय विभागांनी वित्त विभागाची मान्यता घेऊन तद्‌नंतर मा.मुख्य सचिव यांची मान्यता घेणे बंधनकारक राहिल. अधिसंख्य पदनिर्मिती न करता नियुक्ती दिल्यास वेतनासंबंधी काही अडचणी उद्‌भवल्यास त्यास संबंधित विभाग जबाबदार राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०११०८२६१४५९३१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**( शं. ग. सातपुते )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

*१. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र , मुंबई ४०० ०२०

**कृ.मा.प.**

doc

*२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र , मुंबई ४०० ०२०
*३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र , नागपूर
*४. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र , नागपूर
*५. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य
६. सर्व राजकीय पक्षांचे कार्यालये
७. राज्यपालांचे सचिव,
८. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
९. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
१०. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
११. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई ४०० ०५१.
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
*१६. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
*१७. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
*१८. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई
*१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४ अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई
*२०. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, मुंबई
*२१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
*२२. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई
*२३. प्रमुख्य न्यायाधिश, कुटुंब न्यायालय, नागपूर/ मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१.
२४. उपसंचालक, लेखा व कोषागार, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/ नाशिक/अमरावती.
२५. उप लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, नवी मुंबई/पुणे /नागपूर/औरंगाबाद/ नाशिक/अमरावती.
२६. सर्व जिल्हा कोषगार अधिकारी,
२७. सर्व उप कोषागार अधिकारी.
२८. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
२९. सहकार व वस्त्रोद्योग विभाग (कार्यासन हाऊसिंग सेल, १९ -सी) मंत्रालय, मुंबई
३०. सर्व विभागीय आयुक्त.
३१. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३२. सर्व जिल्हाधिकारी.
३३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
३४. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागांतील मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
३५. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
३६. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८ स्टेट एम्पोरिया इमारत खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११० ००१.
३७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.,
३८. सर्व उपसचिव / सहसचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३९. वित्त विभागातील सर्व कार्यासने.
४०. **वित्तीय सुधारणा- १ कार्यासन संग्रहार्थ. (* स्वतंत्र पत्राद्वारे )**